वर्सोवा वांद्रे सागरी सेतू प्रकल्प
वर्सोवा वांद्रे येथील मच्छीमारांच्या
समस्या बाबत समन्वय समितीची
स्थापना

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: व्हीबीएस-२०१९/प्र.क्र.८/रस्ते-६**
**मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई -४०००३२.**
**दिनांक : ७ फेब्रुवारी, २०१९**

**प्रस्तावना :**

मुंबईतील वाहतूक कोंडी व प्रदुषण या समस्येवरील उपाययोजनेचा एक भाग म्हणून वर्सोवा वांद्रे सागरी सेतूचा प्रकल्प महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळातर्फे राबविण्यात येत आहे.

या प्रकल्पाच्या बांधकामाच्या अनुषंगाने स्थानिक कोळी बांधवांच्या काही समस्या आहेत. सदर ठिकाणावरुन कंत्राटदारांच्या यंत्रसामुग्रीची ये-जा होत असल्यामुळे कोळी बांधवांचा व्यवसाय बाधीत होतो, असे त्यांचे म्हणणे आहे. याबाबतची नुकसान भरपाई देण्यात यावी, अशी मागणी कोळी बांधवांकडून करण्यात आलेली आहे. सदर प्रकरणात कोळी बांधव व कंत्राटदार यांच्यामध्ये समन्वय साधण्यासाठी व त्यांच्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी समन्वय समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वर्सोवा-वांद्रे सागरी प्रकल्पामुळे उद्भवलेल्या मत्स्य व्यवसायाशी संबंधित समस्यांचे निराकरण व समन्वयासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| १. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि.म. | अध्यक्ष |
| २. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरी टाईम बोर्ड | सदस्य |
| ३. सहव्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि.म. | सदस्य |
| ४. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर | सदस्य |
| ५. संचालक, मत्स्यव्यवसाय संचालनालय | सदस्य |
| ६. पोलीस उपायुक्त, बांद्रा, मुंबई | सदस्य |
| ७. पोलीस उपायुक्त, वरळी, मुंबई | सदस्य |
| ८. प्राधिकरण अभियंता (Team Leader) | सदस्य |
| ९. कंत्राटदारांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १०. मच्छिमार प्रतिनिधी | सदस्य |
| ११. मच्छिमार प्रतिनिधी | सदस्य |
| १२. मच्छिमार प्रतिनिधी | सदस्य |
| १३. मुख्य व्यवस्थापक, पर्यावरण, म.रा.र.वि.महामंडळ | सदस्य |
| १४. मुख्य अभियंता, म.रा.र.वि.महामंडळ | सदस्य सचिव |

<u>समितीची कार्यकक्षा</u> -

१. कंत्राटदाराने जलमार्गाचा वापर केल्याने मच्छिमार बांधवांच्या दैनंदिन मासेमारीच्या व्यवसायाचे नुकसान होत असल्यास त्याबाबत खातरजमा करुन अनुज्ञेय नुकसान भरपाईची रक्कम ठरविणे.
२. कंत्राटदारांच्या यंत्रसामुग्रीमुळे मासेमारी जाळी अथवा साहित्यास इजा झाल्यास त्याबाबत देय नुकसान भरपाई ठरविणे.
३. वरील कामासाठी आवश्यक वाटल्यास सर्व संबंधिताशी चर्चा करणे / कामाच्या जागेस भेट देणे.
४. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास वरील बाबतीतील शिफारशी अंतर्भूत असलेला अहवाल सादर करणे.
५. संबंधित कंत्राटदार वा मच्छिमार बांधव यांचेमध्ये नुकसान भरपाई तसेच त्या अनुषंगाने उद्भवणा-या या बाबींसंबंधी समन्वय साधण्यासाठी ही समिती प्रयत्नशील राहील. जेणेकरुन करुन बांद्रा, चिंबई, खारदांडा, जुहू व वर्सोवा या दरम्यान सागरी सेतू मार्गाचे बांधकाम सुरळीत चालू राहील.
६. कार्यक्षेत्र विचारात घेवून संबंधित पंजीबध्द मच्छिमार सहकारी संस्थेच्या अध्यक्षांना बैठकीत निमंत्रित करण्याचे अधिकार समितीस राहतील.

महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ सदर समितीच्या शिफारशीचा विचार करुन योग्य तो निर्णय घेऊन पुढील कार्यवाही करेल व या प्रकरणी महामंडळाचा निर्णय अंतिम राहील.

सदर आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापासून ही समिती अस्तित्वात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९०२०७१६५७४५९४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sumant Dinkar Pashte

Digitally signed by Sumant Dinkar Pashte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, cn=Sumant Dinkar Pashte
Date: 2019.02.07 17:00:41 +05'30'

**( सु.दि. पाष्टे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपीयन सी. रोड, मुंबई

२) सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपीयन सी. रोड, मुंबई

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरी टाईम बोर्ड,इंडियन मर्केटाईल चेंबर, तिसरा मजला, रामजी कामानी मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई

४) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, प्रशासकीय इमारत, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, कलानगर, बांद्रा, मुंबई.

५) संचालक, मत्स्यव्यवसाय संचालनालय, प्रशासकीय इमारत,दुसरा मजला, बांद्रा(पूर्व), मुंबई - ४०० ०५१

६) पोलीस उपायुक्त, बांद्रा, मुंबई

७) पोलीस उपायुक्त, वरळी,  मुंबई-२५, वरळी, मुंबई

८) संबंधित मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ

९) कंत्राटदारांचे प्रतिनिधी

१०) श्री विजय व्ही. वरळीकर, ६५, डी. वरळी कोळीवाडा, वरळी व्हिलेज, मुंबई ४०० ०२५

११) प्रकल्पाचे अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मंडळ

१२) प्राधिकरण अभियंता (Team  Leader)

१३) संबंधित मच्छिमार  संघटना , (महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ) मार्फत

१४) निवडनस्ती